महाराष्ट्र राज्य शासकीय हमी
हमी राखीव निधी
हमी शुल्क

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शासन हमी-1099/प्र.क्र.68/शासन. हमी,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 5 नोव्हेंबर, 1999.

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद 293(1) अन्वये राज्य शासनाला प्रदान केलेल्या अधिकारांनुसार, भारतात कर्ज मिळविण्यासाठी राज्याच्या एकत्रित निधीच्या तारणावर राज्य शासन हमी देते. त्या अनुषंगाने राज्य शासनाने वेळोवेळी शासन निर्णय निर्गमित केलेले आदेश. या विषयावरील पूर्वीचे आदेश अधिक्रमित करुन सर्व समावेशक, (omnibus) आदेश निर्गमित करण्याचा प्रश्न राज्य शासनाच्या विचाराधीन होता. आता पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-** शासन हमीच्या संदर्भात सर्व बाबींचा सांगोपांग विचार करुन हमी शुल्क आकारणीसंबंधी खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

(1) 1. प्रचलित हमी शुल्काचे दर प्रतिशत प्रतिवर्षी रु.2/- रहातील.

2. खालील प्रवर्गाबाबत मात्र हमी शुल्काचे दर सर्वसाधारण परिस्थितीत प्रतिशत प्रतिवर्षी 50 पैसे असा राहील. तर पूर्वीच्या कसूरदारांच्या बाबतीत तो प्रतिशत प्रतिवर्षी रु.1/- राहील.

(अ) लहान व सीमांतक शेतकरी, भूमिहीन मजूर इत्यादिसारख्या आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांना पतपुरवठा करणा-या सहकारी संस्था आणि

(ब) अनुसूचीत जाती व जमातीच्या सहकारी संस्था.

3. कर्जाची परतफेड करण्यास व व्यांज देण्यास कसूर करणा-या लाभधारक संस्थांच्या बाबतीत नव्याने घेतलेल्या कर्जासंदर्भात हमी शुल्काचा दर प्रतिशत प्रतिवर्षी रु.4/- असा राहील.

(2) अर्थसंकल्पावर पडणारा अतिव ताण लक्षात घेता प्रशासनिक विभागाने खालील मार्गदर्शक तत्वांचे पालन करणे अत्यावश्यक आहे.

(ए) हमी प्रस्तावाच्या प्रत्येक प्रकरणी मंजुरी देण्यापूर्वी हमी दिल्याने लोकहित साधणार आहे याची खात्री केली पाहिजे.

(बी) पूर्वीच्या कसूरदारांच्या बाबतीत किंवा ज्या प्रस्तावांमध्ये वर्धन क्षमतेबद्दल हमी द्यावयाच्या कर्जाची परतफेड तसेच कर्जाच्या रकमेवरील व्याज देण्याच्या क्षमतेबद्दल शंका असेल अशा विशिष्ट प्रकरणात शासन हमीचा लाभ देण्यापूर्वी मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात यावी.

(सी) हमी मंजुरीच्या आदेशात हमी किती कालावधीकरिता दिलेली आहे याचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

(डी) हमी मंजुरी आदेशात हमी रकमेचा उल्लेख करतांना आदेशांत दर्शविलेली रक्कम किंवा प्रत्यक्षात वापरात आणलेली रक्कम यापैकी जी कमी असेल अशा रकमेचा स्पष्ट उल्लेख करावा.

(ई) ज्यायोगे लाभधारक संस्थेकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्यामध्ये होणा-या कसुराची शासनास त्वरित सूचना देणे वित्त संस्थांवर बंधनकारक असेल. अशा प्रकारची तरतूद वित्त संस्थांबरोबर केलेल्या करारात असावी.

(एफ) कसूरदारांच्या बाबतीत वसुलीचे सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय वित्त संस्था सहजासहजी हमी परिपूर्तीबाबतची प्रतिभूती म्हणून शासन हमीचा वापर करणार नाही अशी तरतूद करारात असावी.

(जी) राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय कसूरदार संस्थांना अधिक कर्ज उभारणी करण्यास प्रतिबंध असावा.

(एच) ज्या प्रकरणात शासकीय हमी दिली असेल त्या प्रकरणावर संनियंत्रण ठेवण्याची सर्व जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची असेल. मागील वर्षामध्ये दिलेल्या हमीचा वार्षिक आढावा घेऊन त्या अहवालाची प्रत वित्तीय वर्ष संपल्यानंतर दोन महिन्यांच्या आत वित्त विभागास पाठवावी.

(3) शासन खालीलप्रमाणे हमी शुल्क वसुलीसंबंधी एकसूत्री सर्व समावेशक कार्यपध्दती विहित करीत आहे.

1. हमी शुल्क वर्षाच्या शेवटी, प्रत्यक्ष अदत्त असलेल्या घटनासापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) आकारले जाते.
2. हमी शुल्काची वसुली प्रत्येक 6 महिन्यांच्या कालावधीसाठी करावी.
3. हमी कालावधी 6 महिने किंवा त्यापेक्षा कमी असल्यास हमी शुल्काचा भरणा, हमी देण्याचे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून 14 दिवसांच्या आत करावा.
4. हमी कालावधी 6 महिन्यांपेक्षा अधिक असल्यास,
   (अ) प्रत्येक वित्तीय वर्षाच्या 31 मार्च आणि/अथवा 30 सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या घटनासापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) अनुज्ञेय असलेल्या हमी शुल्काचा भरणा 1 एप्रिल आणि/अथवा 1 ऑक्टोबर रोजी करावा.
   (ब) शेवटच्या सहामाहीसाठी 31 मार्च/30 सप्टेंबर ऐवजी परतफेडीच्या देय दिनांकापर्यंत अदत्त असलेल्या घटनासापेक्ष दायित्वावर हमी शुल्काचा भरणा करावा.
   (क) हमी शुल्काच्या परिगणनेसाठी, महिन्यातील 15 दिवसांपेक्षा कमी दिवस वगळण्यात यावेत आणि 15 दिवस किंवा त्यापेक्षा अधिक दिवसांचा कालावधी पूर्ण महिना म्हणून गृहीत धरण्यात यावा.
5. हमी मंजूर केलेल्या शासन निर्णयाचा दिनांक आणि कर्जाचे प्रत्यक्ष वितरण यामध्ये मंदन अवधी (Time Lag) असला तरी हमी शुल्क, हमी देण्याचे दिनांकापासून उपर्युक्त कार्यपध्दतीनुसार भरावे.
6. नियत दिनांकास अनुज्ञेय हमी शुल्क भरण्यास कसूर करणा-या संस्थांना अदत्त हमी शुल्कावर पहिल्या 3 महिन्यांसाठी 16 प्रतिशत व त्यापुढील कालावधीसाठी 24 प्रतिशत या दराने दंडनीय व्याज आकारले जाईल.
7. वसूल केलेले हमी शुल्क "0075-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-108 हमीशुल्क" या लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावे.
8. नियत दिनांकास हमी शुल्क वसूल करण्याची जबाबदारी विवक्षित अधिका-यांवर सोपवावी. हमी आदेशात त्याचे नाम/पदनिर्देश साक्षेपाने करावे.
9. हमीशुल्क भरल्याच्या पृष्ठ्यर्थ चलनाची साक्षांकित प्रत वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

(4) शासनाने असाही निर्णय घेतला आहे की, हमीबाबतचा प्रस्ताव वित्त विभागाकडे पाठविताना खालील नमूद केलेल्या मुद्यांच्या संदर्भात आवश्यक ती माहिती संबंधित विभागाच्या सचिवांच्या सहीच्या प्रमाणपत्रासह पाठविण्यात यावी.

1. पूर्वी घेतलेल्या कर्जावरील हमी शुल्क वेळोवेळी नियत दिनांकास भरले किंवा कसे.
2. प्रस्तावित हमीची कालमर्यादा व परतफेडीचे वेळापत्रक दर्शविणारे विवरणपत्र.
3. शासनाकडून तसेच वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जापैकी अदत्त कर्जाची रक्कम, थकबाकीच्या स्पष्टीकरणासह दर्शविणारे परतफेडीचे वेळापत्रक.
4. सध्या घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यामध्ये झालेल्या कसुरीचा तपशील, त्यामुळे देय झालेले व्याज (कारणमिमांसेसहीत).
5. सध्या घेतलेले व प्रस्तावित केलेले कर्ज याची परतफेड कधी करणार हे दर्शविणारे, उपलब्ध निधीचा ओघ दर्शविणारे विवरणपत्र.
6. लाभधारक संस्थेचे मागील 3 वर्षाचे नफा-तोटा दर्शविणारे लेखे व ताळेबंदीपत्रक यांचे संदर्भ देऊन निर्धारित केलेली आर्थिक स्थिती दर्शविणारे विवरणपत्र.

(5) शासन पुढे असा आदेश देत आहे की, शासनाचे हमी विषयक हितसंबंध जपण्याचा उचित उपाय म्हणून प्रत्येक शासन हमी मंजूरीच्या निर्णयासोबत तत्संबंधीचा प्रमुख तपशील दर्शविणारे निविष्टी प्रपत्र (INPUT PROFORMA) जोडणे आवश्यक आहे. सदर निविष्टी प्रपत्राचा नमुना प्रशासकीय विभागांच्या माहिती व उपयोगासाठी सोबत जोडण्यात आला आहे. तद्नुसार शासनाने मंजूर केलेल्या प्रत्येक शासन हमीच्या प्रकरणी तत्संबंधीचा शासन निर्णय

निर्गमित करताना त्यासोबत आवश्यक त्या सर्व तपशीलासह सदर निविष्टी प्रपत्र (INPUT PROFORMA) जोडण्यात आलेला आहे याची संबंधित प्रशासकीय विभागाने दक्षता घ्यावी. निविष्टी प्रपत्रामधील तपशील शासनाने मंजुरी दिलेल्या शासन हमी विषयक तपशीलाशी अनुरुप असावा.

(८) शासन हमी मंजुरीसाठी शासनाने हमी शुल्क विहित केलेले असल्यामुळे अशा प्रत्येक शासन हमी मंजुरी प्रकरणांमध्ये हमी शुल्क भरणा करण्याच्या चलनाच्या प्रतींची पडताळणी करुन सदर चलनाच्या प्रति वित्त विभागाकडे (हमी) पाठवण्याची जबाबदारी सर्वस्वी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील. तदनुसार अशा प्रत्येक शासन हमी मंजुरीच्या प्रकरणी हमी शुल्क वेळोवेळी विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार आणि विहित केलेल्या अर्थसंकल्पीय शीर्षाखाली प्रत्यक्ष भरणा केले जात आहे किंवा कसे याची पडताळणी करुन तत्संबंधी खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि.प्र.कुळकर्णी,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

भारत सरकारचे सचिव, वित्त मंत्रालय, नवी दिल्ली,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-2, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-2, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती,
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
मंत्रालयीन सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयाचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य,
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला,
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती/कार्यासन शासन हमी.

<u>संदर्भांकित शासन निर्णय.</u>

(1) शा.नि.क्र.शासन हमी-1088/1/78/शासन हमी, दिनांक 18 नोव्हेंबर, 1988.
(2) शा.नि.क्र.शासन हमी-1090/114/शासन हमी, दिनांक 14 नोव्हेंबर, 1990.
(3) शा.नि.क्र.शासन हमी-1096/प्र.क्र.133/96/शासन हमी, दिनांक 15 एप्रिल, 1997.

---

* [illegible]

# INPUT PROFORMA
# FOR GUARANTEE

Sanction No. ____________________

Sanction Date ________/________/________
(dd) (mm) (yy)

Guarantee No. ____________________

Borrowing Institute : ____________________

Financing Institute : ____________________

Purpose of Guarantee : ____________________

Amount Guaranteed : ____________________

Principal : Rs. ____________________

Interest : Rs. ____________________

Period of Loan : ____________________ Years

Rate of Interest : ____________________ %

Schedule of repayment. : ____________________

| Amount of Instalment | | | |
|---|---|---|---|
| Principal | Interest | Date of payment of<br>i) Principal<br>ii) Interest | Amount of Guarantee Fee. payable |
| | | | |

Signature and Designation
of Sanctioning Authority.